**सन २०२३-२४ “राष्ट्रीय बांबू अभियान” (केंद्र पुरस्कृत योजना) या योजनेंतर्गत केंद्र शासनाकडून मंजूर करण्यात आलेल्या राज्य वार्षिक कृती आराखड्यास अनुसरुन सर्वसाधारण घटकाकरिता केंद्र हिस्सापैकी द्वितीय हप्त्याचा केंद्र हिस्सा व त्यासमरुप राज्य हिस्साचा निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र. बांबूसा-२०२३/प्र.क्र.१६८/फ-९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २० मार्च, २०२४

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि. १२.४.२०२३, ५.२.२०२४ व ४.३.२०२४
२) भारत सरकार, कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.No.४४-४३/२०१८-NBM(Part-१) (८२८५२), दिनांक ४.८.२०२३
३) शासन निर्णय समक्रमांकीत दिनांक २.११.२०२३
४) भारत सरकार, कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.No.४४-४३/२०१८-NBM(Part-१) (एफटीएस-८२८५२), दिनांक ४.३.२०२४
५) अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष- १/सी/यो/NBM/प्र.क्र.५४/३५४/२०२३-२४ दिनांक १२.३.२०२४

**प्रस्तावना :-**

सन २०२३-२४ करिता राष्ट्रीय बांबू अभियान अंतर्गत (केंद्र पुरस्कृत योजना) (२४०६ ८६३१) ३१-सहायक अनुदाने अंतर्गत रु.१३४९.९६ लक्ष व ३३-अर्थसहाय्य अंतर्गत रु.०.०४ लक्ष असे एकूण केंद्र हिस्सा रु.१३५०.०० लक्ष आणि राष्ट्रीय बांबू अभियान (२४०६ A००४) या लेखाशिर्षांतर्गत ३१-सहायक अनुदाने अंतर्गत रु.८९९.९६ लक्ष व ३३-अर्थसहाय्य अंतर्गत रु.०.०४ लक्ष असे एकूण राज्य हिस्सा रु.९००.०० लक्ष नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पीत आहे. वाचा येथील नमूद क्र.२ च्या शासन निर्णयान्वये प्रथम हप्ता केंद्र व राज्य हिस्सा असा एकूण रु.३९४.०० लक्ष इतका निधी वितरीत करण्यात आला आहे.

सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाकरीता केंद्र पुरस्कृत योजना “राष्ट्रीय बांबु अभियान” या योजनेकरीता सर्वसाधारण घटक, अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती घटक मिळून रु.२८०८.२० लक्षचा वार्षिक कृती आराखडयास वाचा येथील क्र.२ च्या केंद्र शासनाच्या शासन आदेशान्वये मंजुरी प्रदान केली आहे. तसेच वाचा येथील क्र.४ च्या केंद्र शासनाच्या दिनांक ४.३.२०२४ रोजीच्या पत्रान्वये सदर योजनेंतर्गत केंद्र हिस्सा ६०% रु.१६८४.९२ लक्ष प्रमाणे केंद्र शासन द्वितीय हप्ता रु.३००.०० लक्ष मुक्त केला आहे. त्याअनुषंगाने अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या वाचा येथील क्र.५ च्या पत्रान्वये राज्य हिस्सा ४०% रु.११२३.२८ लक्ष प्रमाणे राज्य द्वितीय हप्ता रु.२००.०० लक्ष उपलब्ध करुन देण्याची विनंती केली आहे. त्यानुसार राष्ट्रीय बांबू अभियान (केंद्र पुरस्कृत योजना) या योजनेअंतर्गत अर्थसंकल्पित असलेल्या नियतव्ययाच्या अनुषंगाने अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर वाचा येथील क्र.५ च्या पत्रान्वये राष्ट्रीय बांबू अभियानाची अंमलबजावणी करणेकरिता सन २०२३-२४ करीता सर्वसाधारण घटकाकरिता २४०६-८६३१ (केंद्र हिस्सा ६०%) रु.२३६.४० लक्ष व लेखाशिर्ष २४०६-A००४ (राज्य हिस्सा) रु.१५७.६० लक्ष असा एकूण रु.३९४.०० लक्ष इतका निधी वितरीत

करण्याबाबत विनंती केलेली आहे. त्यानुसार या कामासाठी अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासनाचे कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालयाचे वाचा येथील क्र. २ व ४ चे आदेश, अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी वाचा येथील क्र.५ नुसार सादर केलेला प्रस्ताव व वित्त विभागाचे वाचा येथील क्र.१ चे परिपत्रक आणि बीम्स प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी विचारात घेता, राष्ट्रीय बांबू अभियान (केंद्र पुरस्कृत योजना) सन २०२३-२४ करीता केंद्र हिस्सापैकी द्वितीय हप्त्याचा निधी सर्वसाधारण घटकाकरीता लेखाशिर्ष २४०६-८६३१ (केंद्र हिस्सा ६०%) रु.२३६.४० लक्ष व लेखाशिर्ष २४०६-A००४ (राज्य हिस्सा ४०%) रु.१५७.६० लक्ष असा एकूण रु.३९४.०० लक्ष इतका निधी खालील अटींच्या अधीन राहून वितरीत करण्यास शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१) वितरीत केलेला निधी केंद्र शासनाने संदर्भीय पत्रान्वये मान्यता दिलेल्या तपशिलवार कार्यबांबीवर व सदर कामांना सक्षम प्राधिकाऱ्याची प्रशासकीय व तांत्रिक मान्यता असल्याखेरीज रक्कम काढण्यात येऊ नये.

२) वितरित केलला निधी केंद्र शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेस विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून, प्रचलित धोरण व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

३) सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे.

४) उपरोक्त खर्च विहीत कार्यपध्दतीनुसार तसेच अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध मासिक निधी प्रवाहानुसार खर्च करण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

५) नियंत्रक अधिकाऱ्यांना सूचित करण्यात येते की, एकूण वितरीत केलेल्या/करण्यात येणाऱ्या तरतूदीपेक्षा कोणत्याही परिस्थितीत अतिरिक्त खर्च होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

६) सदर तरतूद खर्च करतांना वित्त विभागाने वेळो वेळी घालून दिलेल्या अटी व शर्तीचे पालन करावे.

७) वाटप करण्यात येणा-या अनुदानातून खर्च करताना यामध्ये कोणतीही वित्तिय अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच सदरहू कामे करतांना वन (संवर्धन) कायदा १९८० मधील तरतुदींचा भंग होणार नाही याची सुध्दा दक्षता घ्यावी.

८) अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी तसेच खर्च करताना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील तरतूदी व सर्व अटी/शर्तीचे पालन करावे.

९) सदर आर्थिक वर्ष २०२३-२४ मध्ये मंजूर व वितरीत अनुदानाच्या मर्यादेत खर्च सिमित ठेवावा.

१०) सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान संबंधित कोषागारातून काढून घेतल्यानंतर काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शिर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

११) संस्थेने मागील वर्षाकरिता त्यांनी उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानाच्या विनियोगाबाबतचे प्रमाणपत्र शासनास तसेच महालेखापालांना तात्काळ सादर करावे. त्याचप्रमाणे, आता वितरित करण्यात येत असलेल्या अनुदानाचे तपशिलवार देयक व विनियोग प्रमाणपत्र देखिल (Utilization Certificate) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२ नागपूर व शासनाला तातडीने सादर करावे.

१२) उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरीता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

१३) सर्व कामे दर्जेदार होतील याबाबत योग्य शासन कार्यप्रणालीचा वापर केला जाईल व कोणतीही अनियमितता होणार नाही तसेच सर्व कामांच्या गुणवत्तेबाबत वेळोवेळी आवश्यकतेनुसार तपासणी करावी या सर्व बाबींची जबाबदारी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र बांबू विकास मंडळ, नागपूर यांची राहील.

१४) शासन निर्णय दिनांक ०१ डिसेंबर, २०१६ नियम पुस्तिकेत नमुद केल्यानुसार तसेच उद्योग उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय दिनांक २४ ऑगस्ट, २०१७ मध्ये नमूद गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) पोर्टलची कार्यपध्दती नुसार निविदा प्रक्रियेत ई-निविदा प्रणालीचा वापर करावा.

१५) सदर खर्च वित्त विभागाच्या दिनांक १२.०४.२०२३, ०५.०२.२०२४ व ०४.०३.२०२४ रोजीच्या परिपत्रकातील अटींची पूर्तता होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

१६) सदर मंजूरीस शासन निर्णय क्रमांक एमएससी- २०११/प्र.क्र.१७८/फ-५, दिनांक ३०.९.२०११ च्या परिशिष्टात नमुद केलेल्या अटी व शर्ती बंधनकारक असतील.

**०२.** उपरोक्त केंद्र हिश्याचा खर्च मागणी क्रमांक-सी-७, प्रधान शिर्ष २४०६, वनीकरण व वन्यजीव, १०२ सामाजिक व क्षेत्रीय वनीकरण, (११) सामाजिक व क्षेत्रीय वनीकरण (केंद्र पुरस्कृत योजना), (११)(२१) राष्ट्रीय बांबू अभियान (६० टक्के केंद्र पुरस्कृत योजना) (२४०६-८६३१) या लेखा शिर्षाखाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**०३.** उपरोक्त राज्य हिश्याचा खर्च मागणी क्रमांक-सी-७, प्रधान शिर्ष २४०६, वनीकरण व वन्यजीव, १०२ सामाजिक व क्षेत्रीय वनीकरण, (११) सामाजिक व क्षेत्रीय वनीकरण (केंद्र पुरस्कृत योजना), (११)(२२) राष्ट्रीय बांबू अभियान (४० टक्के राज्य हिस्सा) (२४०६-A००४) या लेखा शिर्षाखाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**०४.** सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक १२.४.२०२३, ०५.०२.२०२४ व ०४.०३.२०२४ चे परिपत्रक तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र/२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७.४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

**०५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२०१५३११५९५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIVEK VIJAY HOSHING

Digitally signed by VIVEK VIJAY HOSHING
DN: c=IN, o=Personal, title=4179,
pseudonym=133142602957487084g5f8e27R5OJA8P,
2.5.4.20=d2eb76cc3763a845a8edf9b9dde07f42d90c6bc17db755d4af91632f6c0b678
e, postalCode=414001, st=MAHARASHTRA,
serialNumber=3b1afe499c80878329fbb017e4922f7356cc5edc76102e8ff88c7b9a67a3
22d9, cn=VIVEK VIJAY HOSHING
Date: 2024.03.20 15:40:44 +05'30'

**( विवेक होशिंग)**

**उप सचिव (वने) महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर

२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन), महाराष्ट्र राज्य, नागपूर

३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर

४) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र बांबू विकास मंडळ, नागपूर.

५) महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.

६) सह सचिव/उपसचिव,वित्त विभाग (अर्थ-३)/(व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२.

७) उप सचिव, नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.

८) कार्यासन अधिकारी, फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

९) निवडनस्ती.